**छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी आर्थिक वर्ष सन २०२५ -२६ करिता निधी वितरीत करण्यास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सारथी २०२५/प्र.क्र.६०/का.१४२५-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २० मे, २०२५.

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/अर्थ-३,दिनांक ०७.०४.२०२५
२. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी),पुणे यांचे जा.क्र.सारथी/लेखा/निधी/२०२५-२६/९०,दिनांक २५.०४.२०२५ रोजीचे पत्र

**शासन निर्णय :-**

छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीस सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता “ओ-०२, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास (०१) मराठा, कुणबी, कुणबी मराठा, मराठा कुणबी यांचे कल्याण (०१)(०१) छत्रपती शाहू महाराज संशोधन प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी) (कार्यक्रम) (२२२५एफ५२१)” या लेखाशिर्षांतर्गत छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेच्या आस्थापना व इतर बाबींसाठी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी आवश्यक निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित अनुदान | या आदेशान्वये वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| १ | १०-कंत्राटी सेवा | ७.५० | १.८० |
| २ | ११-देशांतर्गत प्रवास खर्च | ०.१० | ०.०१७० |
| ३ | ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) | ३००.०० | ९०.०० |
| ४ | ३५-भांडवली मत्तेच्या निर्मितीसाठी अनुदान | २००.०० | ६०.०० |
| ५ | ३६-सहायक अनुदान (वेतन) | ८.२५ | १.९८ |
| | **एकूण** | **५१५.८५** | **१५३.७९७०** |
| | **अक्षरी रुपये - ऐकशे त्रेपन्न कोटी ऐकोणऐंशी लाख सत्तर हजार फक्त** | | |

२. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या संस्थेसाठी सन २०२५-२६ करिता उपरोक्त **एकूण रुपये १५३.७९७० कोटी (अक्षरी रूपये ऐकशे त्रेपन्न कोटी ऐकोणऐंशी लाख सत्तर हजार फक्त)** इतका निधी कोषागार कार्यालय यांना आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पिय नियम पुस्तिकेतील तरतुदी व सर्व अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना, कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास व संबंधितांना सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांची राहील.

३. सदर निधी खर्च करण्यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे तसेच आहरण संवितरण अधिकारी म्हणून मुख्य लेखा व वित्त अधिकारी, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे यांना घोषित करण्यात येत आहे.

४. छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे या कंपनीसाठी उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च हा सन २०२५-२६ साठीच्या असलेल्या उपरोक्त लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली केली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी.

६. सदरचा शासन निर्णय हा वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. २७१/२०२५/व्यय-८ दिनांक ३०/०४/२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३ दिनांक ०७.०४.२०२५ च्या तरतुदीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०५२०१५४४३८१६१६ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY TULARAM INGOLE

Digitally signed by VIJAY TULARAM INGOLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Planning Department, 2.5.4.20=0016E65B6C40267976FB5BC77C0FB10F8371B5388C817DC83EB814EEAE8E846C, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=23690C8B03E3FB291EDA571536D63F41F5DEED8E2320C2F870CD31FCAA1B9A4B, cn=VIJAY TULARAM INGOLE
Date: 2025.05.20 15:46:22 +05'30'

**( डॉ. विजय इंगोले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे (नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक, नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई.

५. अपर मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपुर
७. व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी), पुणे
८. उप सचिव ,वित्त विभाग कार्यासन व्यय-८/अर्थ-१६
९. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१०.निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
११.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२.वरिष्ठ कोषागार अधिकारी,पुणे
१३.कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवडनस्ती कार्यासन १४२५-अ